**विशेष प्रसिद्धी मोहिमेंतर्गत मुंबईतील बेस्ट बसेसमधील एल.सी.डी स्क्रिनद्वारे प्रसारीत करण्यात आलेल्या जाहिरातीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१७/प्र.क्र.५३/अभियान-१**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ मे, २०१७.

वाचा : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव यांचे पत्र क्रमांक प्रद.वि.प्र.मो./२०१६/का-६/ १३७, दिनांक ३०/०९/२०१६.
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग पत्र क्रमांक कौविउवि-२०१५/प्र.क्र. १५६/अभियान-१, दिनांक ०७/१०/२०१६.
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ज्ञापन क्रमांक कौविउवि-२०१६/ प्र.क्र.१११/अभियान-१, दिनांक ०१/०३/२०१७.
५) संचालक (माहिती)(प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, यांचा कार्यादेश क्रमांक प्रदर्शने-२०१६/विप्रमो/ का-६/१५६/ड, दिनांक १०/१०/२०१६.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाच्या वतीने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विविध प्रसिध्दी माध्यमांनुसार विशेष प्रसिध्दी मोहिम राबविण्यात आली होती. त्यानुसार राज्यातील रेडिओ चॅनल्स, बेस्ट बसेसमध्ये एल.ई.डी.स्क्रीन जाहिरात, बेस्ट बसेसच्या साईड व बॅक पॅनलवरील जाहिरात तसेच एस.टी. स्थानकांवर एल.ई.डी.स्क्रिनद्वारे जाहिरात प्रसारित करण्याची कार्यवाही करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांच्या दिनांक १०/१०/२०१६ रोजीच्या कार्यादेशानुसार ५०० बेस्ट बसेस मधील १००० एल.सी.डी स्क्रिनद्वारे या विभागाच्या विविध योजनांबाबत प्रसारित करण्यात आलेल्या जाहिरातींची पूर्तता करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

राज्य शासनाच्या वतीने राबविण्यात आलेल्या विशेष प्रसिध्दी मोहिमअंतर्गत दिनांक १५/१०/२०१६ ते दिनांक २९/१०/२०१६ या कालावधीत कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या विविध योजनांबाबत मुंबईतील ५०० बेस्ट बसेसमधील १००० एल.सी.डी. स्क्रिनद्वारे जाहिरात प्रसारित केल्याबद्दल मे. वर्व्हे कॉम्प्युटर प्रा. लि.मुंबई यांना त्यांचे देयक क्रमांक व्हीईआर/एसआय/०२३/ई/२०१६-१७, दिनांक ०१/११/२०१६ नुसार रूपये २९,८०,८००/- (रूपये एकोणतीस लक्ष ऐंशी हजार आठशे फक्त) इतकी रक्कम अदा करण्यासाठी होणाऱ्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च यापूर्वी करण्यात आलेला नाही.

३. या बाबींवर होणारा खर्च सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानांतर्गत मागणी क्रमांक झेडए-१, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (०८) प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान (२२३०६११८) या लेखाशिर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. राज्यात कौशल्य विकास कार्यक्रमाचे प्रभावी नियोजन व अंमलबजावणी करण्यासाठी सोसायटी नोंदणी अधिनियम, १८६० अन्वये महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीची स्थापना करण्यात आली आहे. तसेच सदर अभियानाकरिता आवश्यक निधी खर्चाच्या प्रतिपुर्तीकरीता कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांमार्फत ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उप लेखाशिर्षांतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

५. विभागाच्या दिनांक १२/०४/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विनियोजन (लेखाअनुदान) अधिनियम, २०१७ अंतर्गत सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्रमांक झेडए-१, २२३० कामगार व सेवायोजन, ०२ सेवायोजन सेवा, ००१ संचालन व प्रशासन, (०१)(०८) प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान (२२३०६११८) या लेखाशिर्षाखालील रूपये ९९०२८६.०० हजार अर्थसकल्पिय तरतूदींपैकी रूपये १६५०४८.०० हजार इतकी लेखाअनुदानाची रक्कम अर्थकसल्पीय अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. या वितरीत निधीतून उपरोक्त खर्चाच्या देयकांची पूर्तता मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांचेमार्फत करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.८, नियम क्रमांक १७ अनुसार जाहिरातींवरील खर्च करण्यास प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या असलेल्या वित्तीय अधिकारांना वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०५१५०१२०५६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S.G. Patil

Digitally signed by S.G. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SDED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f64f9296da4ba15d02d3ad3826a21a74ed080355ac04eef5617c3b4f08af47ae, cn=S.G. Patil
Date: 2017.05.05 15:03:19 +05'30'

**(सं.गि.पाटील)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

२. मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मुख्य सचिव, मंत्रालय , मुंबई,
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. उप सचिव, रोस्वरो-२, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, कफ परेड, मुंबई,
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे,
१३. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
१४. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. निवड नस्ती.